ई-साहित्य प्रकाशन

नेटाक्षरी

१६.०२.०९
अंक : १३

# झिंग झिंग लपालपा

## समकालीन कवितेचा महाकवी अरुण काळे ह्यांस नेटाक्षरीतर्फे भावपूर्ण आदरांजली







***ह्या अंकात वाचा..***



*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..*
netaksharee@gmail.com

# कवितांचा सायरन : अरुण काळेंच्या कविता

## ..डिस्कव्हरीवर सर्वचजण दिसत नसतात..

हे जंगल नसून जंगलाचा भास आहे
हे अभयारण्य भयाचं साम्राज्य आहे
हे उजवीकडून डावीकडं पसरत जात आहे

मुक्त वाऱ्याला धरुन येतात
पक्षी महत्वाकांक्षी दूरवरुन
स्ट्रॉने ओढतात ते किडे,शिल्लक दलदल

हे जलचर,हे सरपटणारे
हे इकडचे,हे तिकडचे
हे वर्गीकरण

इथं बुध्दिवादी वाहतात ओंडके ग्रंथांचे
हे विचारपूर्वक पानं कुरतडणारे
हे लबालबा पानं खाणारे
हा चतुष्पाद करतो आराम सावलीत
हे द्विपादाच प्रवचन अर्धे डोळे उघडून
खंथाचा मूड पकडून

विषवेलीसारखे हे आदिम साप
ह्यांच्या मणक्यात कमी होत नाही गॅप

हे मॉडेल्स टिव्हीवर झळकणारे
हे वरकड मध ओरबाडणारे केसाळ

ही करते शिकार,तो करतो आराम
हिच्या जिवावर तो नेहमी उदार

लबाडांना होतोय अपचनाचा त्रास
जंगल वाटून घेणाऱ्यांचे
हे निष्प्रभ सामाजिक संघटन

हे दाढीवाले,ते तुरेवाले
हे आयाळवाले
हे धारदार नाकवाले
हे हातभर जीभवाले

आकाशात नजर ठेवून सरपटणारे
जमिनीत नजर ठेवून उडणारे
सर्वचजण डिस्कव्हरीवर दिसत नसतात

## ..आयटीचा रेडलाइट एरिया : झलक..

म्हायतीच्या गोदीत गोळा झाली
जगभरातली म्हायती,स्फोट होण्याची गोष्ट
तर नवीन माहिती मिळाली
स्फोट नाय प्रस्फोट

प्रस्फोटप्रुफ व्हायचं असेल तर या माझ्या मागं
या तमाम रोंढ्यामोंढ्यांनो,वेड्यांनो,दलालांनो
वेश्यांनो,महारोग्यांनो,एड्सांनो,पाडसांनो या

महाजाळाच्या सुरक्षित वस्तीत चला
हातांचा करिष्मा दावणाऱ्यांनो,कलावंतांनो
आख्ख्या पाच बोटांचा हात नसला चालंल
बटन दाबायला बोटाचं थोटूकही चालतं
कुठही घुसा अन बाहेर या

काय वं बाय,काय हाये म्हायती ? कशी दिली ?
कंची,किती पायजे ? क्रेडिट कार्डबी चालतं
लय काय काय हाय,मुजीकमधीपण हाय
आम्ही इंद्राच्या बारच्या बारांगणा
सहजीवनाच्या येगयेगळ्या जोड्या पाहतोस का ?
आयटीच्या गोलपीठात येतो की
मथुरेच्या शॉपिंग मॉलात ?

ग्रीन बेल्टातले दिवस रात्र पडून असत्यात ब्लू रुमात
पोरं बाळं तयार झालीत
सर्फत सर्फत येत्यात हिंडून कुठूनबी
जॅकबॉय,जॉनबॉय जागराला या

घुंबनाक घुंबनाक,झिंग लपा लपा लपा
बघा बघा बघा बघा,लगबगा लगबगा

तर हा आला आयटीचा रेडलाईट नाका
मावशे तुझ्या दुधाच्या पिशव्यांना घेत नाही कुणी
काढू नको उणीदुणी,भीक तुझं अन्नपाणी

बाकीच्यांनी सेवा करा,टोल भरा
बांधा,वापरा,हस्तांतरित करा
म्हायतीचा घनकचरा कितीही साठो
कंडोमच्या घंटागाडीत पाठवतो आम्ही

इथली एकच ग्राफी
बाळा करु नको फोटोग्राफी





म.वि.प्र. आयोजित कविवर्य केशव मेश्राम स्मृतिप्रीत्यर्थ कविसंमेलनात कविता सादर करताना अरुण काळे. हे काव्यवाचन त्यांचे अखेरचेच ठरले.

## ..कवीचं कालबध्द असणं..

भावड्या प्रश्नांवर बेतून
आयुष्याची क्रियाशीलता
होत नाहीत कवींच्या नेमणूका
पदोन्नती वा पदावन्नती
कवीला घ्यावी लागते रिस्क
झोपेत कविता हरवण्याची
कवितेत झोप हरवण्याची

चढून आलेल्या जिन्याला पायऱ्या किती ?
शर्टाला बटनं किती ?
पाठीमागच्या भिंतीचा रंग कोणता ?
हे मुलाखतीचं सामान्यज्ञान
कवीचं लक्ष नसतं अश्या जी के कडे

कुणी म्हणतात अक्षरांच्या पागलखान्यातला वेडा
संशयानं पाहतात लोक कवीकडे
तपासतात कवितेमागे आहे कुणाचा हात
कवीचं लक्ष नसतं अशा अफवांकडे

कवी चाळतो ताजं वर्तमानपत्र,पण ती नसते कविता
वार्तापत्रात शिगोशिग भरलेल्या असतात कविता
कविता असते पोपडा
पोपड्याच्या आत कविता
पण कवीला असावं लागतं बाहेर
एका मुद्याला धरुन सुरु झालेली कविता
तोच मुद्दा सोडून होते पूर्ण
इथल्या समाजकल्याणासारखी

आणि कवीला रिटायर्ड करायला उठतात लोक
पण काळच देतो त्याला प्रेमाचा निरोप
किंवा पाठवतो घरी,साधं फुलही न देता
आणि कवीच असतो स्वतःचा काळ

..प्रेमाचं होऊ द्या ना जागतिकीकरण..

बापाने मुलाला विचारलं,कितव्या वर्गात शिकतोस ?
मुलाने बापाला विचारलं,तुमचं पूर्ण नाव काय ?
मोठ्या मुलाने चितेला अग्नी दिला
कुर्यात सदा मंगलम
मागून मोबाईलवर रिंगटोन आला
पोटात कृमी झाल्या
आजीबाईनं बटव्यातून शीतपेयाची बाटली दिली
तीन वेळा घे म्हटली
दर तासाला पतीशी संपर्क ठेवणारी विचारते
हुरहूर म्हणजे काय ?
विषारी मित्राने न्यू इअर विश केले
पाडव्याला इलेक्ट्रॉनिक वस्तुंच्या विक्रीत वाढ झाली
नातेवाईकांनी फोन आणि क्रेडिट कार्डची चौकशी केली
प्रत्यक्ष भेटण्याआधी दोघांनी घेतला घटस्फोट इंटरनेटवर
टर्मिनेटरसारखी प्रजनन क्षमता नसलेली
माणसं बाजारात आली
कृत्रिम पावसाच्या कवितांना
राज्य पुरस्कार मिळाला
काही कवितांचे रिमिक्स झाले
डिजीटल कवितासंग्रह आले
पाचजणांनी मिळून सुरु केलं
पॉली समिक्षा केंद्र
हॉररवाल्यांनी सूचना छापली
भीतीची जनुकं सोबत आणल्याशिवाय
थिएटरमध्ये प्रवेश मिळणार नाही
टेलिफोनवाला बोलला हॅलो कंट्रोल,
मी म्हसणवटीच्या डीपीवरुन बोलतोय
मुलं सायबर कॅफेत गेली खेळायला
बाप इनायत कॅफेत दारु प्यायला
ज्याला वरची कमाई तो लोकप्रिय झाला
बारमालक,स्टाफ आणि बारबालांमधी
उदारीकरणाच्या आल्या लाटा
पुरुषांना मिळाल्या ॲडिशनल खाटा
आरोग्याच्या सभा आणि रोगांची शिबीरं
सती जाण्यायोग्य आल्या विद्युतदाहिनी
सोवळ्याने वाढलं रिमोटद्वारे पाणी
शेतकरी कवीसारखी करु लागले आत्महत्या
चायना बाजारात आलं भारतीय संगीत
बहोत सही आवाज है नाक्यावर आल्या प्रतिक्रिया
वाळवंटाचा सीन आला
धुळीची ॲलर्जीवाला उठून बाहेर गेला
विश्वसुंदरीसारख्या रडू लागल्या
खेड्यापाड्याच्या मुली बक्षीस मिळाल्यावर
भटके स्केटींग करीत निघाले
आदिवासींना मिळाली आर्टिफिशल जंगलं
दलितांना मिळाला मटन वेफर्सचा व्यापार
एका माणसाचा झाला एक समाज
दोघांचे दोन समाज,शंभरांचे शंभर
सगळी नाती आली चोरबाजारात
विचारवंत फिरु लागले गुरख्यांसारखे
डांबरीकरणासारखा उखडला पुन्हा पुन्हा
रस्त्यातला माणूस
प्रेमाला डांबलंय देवळात
द्वेषाला एक्स्चेंज ऑफर द्वेषाचीच
प्रेमाच्या भरुन येत नाहीत ट्रक्स
ट्रेन,विमानं आणि जहाजं
हवा पाणी राहिले नाही सर्वांचे
रस्ते वाटा राहिल्या नाहीत सर्वांच्या
जगाचं ग्लोबल गाव केलंय ना
तर प्रेमाचं होऊ द्या ना बावा जागतिकीकरण



..एन आर आय..

अटकावून दिलं,फरफटत नेलं
घोडा आला,बैल आला,गाढव आलं
पाठीवर बसून दौडले
पाठीवर वाहून दमले
अनिवाश्यांची भटकंती
माळामाळातून,हागंदऱ्यांतून

निरभवनेचं पाण्यात घर
त्रिभुवन बेघर
वसावे उजाड
महाले पाठी बिऱ्हाड
गावीत विस्थापित
राऊत प्रलयांकित
मूलनिवासींचा खाते उतारा
तीन तेरा नऊ बारा
अनेकतेतील एकतेचा किराणा भुसारा सारा

मजूर सर्वांना मालक म्हणतो
छोट्या मालकाला बाबा म्हणतो
भिकारी शेठला काका म्हणतो
आदिवासी सर्वांना सायब म्हणतो
महारीण पाटलिणीला म्हणते,आत्याबाय!

सगळे उपेक्षित देशाला म्हणतात
'माय'..!
माय म्हणते धुडूत..!
देश माती आहे की माणूस ?

..स्पॉन्डिलायटिस..

आवंढ्यासारखी गिळता येत नाही
भळभळणारी कविता
मुक्यामुक्यानं जगावं
असं नाहीये एखादं जंगल
गणित हेच जीवन ह्या सुत्रापुढे
शांत उभे ओले डोळे
स्वतःचा कंटाळा आला की
दुसऱ्याच्या जवळ जावसं वाटत नाही
देश समाज कुटूंब
ह्या शेंबडासारख्या हाताला चिकटलेल्या संज्ञा
हा माझा अर्धवट पंजाबी मित्र
त्याच्या घराला लागलंय मोहोळ
चिचुंद्रीही त्याच्या घरात फिरतेय
हे शुभसंकेत असूनही
त्याला सांगून येत नाहीये मुलगी
माझ्या स्वतःच्या वेगळ्या चिंता असतांना
मी त्याची चिंता का करतोय ?
हा एक द्वितीयांश ग्लास दूध पिऊन
दहा किलो दफ्तर वाहणारा माझा मुलगा
ही चळवळीला दुरावलेली
रक्तदाब जडलेली माझी बायको
ह्या म्हाताऱ्या आईची करता येत नाही
कपभर देखभाल
हा माझा खंडू कुत्रा
रडतोय पामेरियनसारखा
ही माझी चळवळ झालीय
अ.भा.चिडिमार संघटना
पण ह्या चिंता तर
फारच बुळबुळीत झाल्यात
त्यापेक्षा कॅरीबॅगची चिंता बरी
वैश्विकतेच्या जवळ गेल्याचं समाधान तरी
खरं तर मी महाकाव्याचाच प्रोजेक्ट केलाय
पण ह्या झाटभर कविताही दमवू लागल्यात
आयला,ह्या स्पॉन्डिलायटिसच्या तर !



..हे शहर..

अर्धशिशीसारखे सकाळी उठणारे
रात्री दोन घास निवांत खाणारे
मौजमजेत जागणारे हे शहर
काल इथं कली शिरला माणसात
माय लेकरं एकमेकाला धरिनात

दंगलतज्ञांचा समूह कामाला लागला
कर्फ्यूच्या शांततेपूर्वीचा भडका उडाला

भरदुपारी सुनसान मेनरोड आज
रवंथ करीत पडलाय अजगरासारखा
पाखरंही वळचणीत भांबावलेली
रोज रहदारीत बसणारी गुरं
कत्री आय़ गायब जणू नामशेष

मुक्या मारातून शिणका उठाव्यात
तसे वाजतात सायरन
ऍम्ब्युलन्सचे,फायरब्रिगेडचे
पायलट गाड्यांचे आणि रातकिड्यांचे
चार पाळयांच्या भोंग्यांनी बांधलेले
शांतता व सुव्यवस्थेच्या परंपरेचे

हे शहर,
आता वाटतेय सायरनचे..



..काही फरक पडत नाही..

पृथ्वीच्या डेकवर उभे राहा
क्षितीजाच्या खाली वाकून पाहा

लोंबकळताहेत ना अनेक जीव अधांतरी
काय होणार आहे त्यांचं ह्या शतकात
हे शतकही पक्षपाताचंच असेल का ?

हेच असणार आहे का त्याच्या पोटात
हे निरर्थक भटकणारे लैंक
हे प्रत्येक गारुड्याभोवती जमणारे
टाईमपासवाले

हे कठंही झोपणारे,रात्रभर खोकणारे
हे शाळा नसलेले बेवारस कुत्र्यांसोबत वाढणारे
हे भरल्या संसारातून पळून गेलेले
कुणालाही बच्चा म्हणणारे
ह्या मंदबुध्दीच्या गर्भवती माद्या

यांच्या गर्भाला नसतो कर्ता धर्ता
ह्या उदरनिर्वाहासाठी झोपणाऱ्या
सकाळी तोंड सुजून उठणाऱ्या
हे निरंकारी किंवा मनोरुग्ण
कोण करणार आहे यांच्या चेहऱ्यांची
साफसफाई ?

मागे उभी राहणारी
अशी येणार आहे का व्यवस्था
निर्दोष जीवन जगू देणार आहे का व्यवस्था ?

दोन पावसाच्या पलीकडं जाणार आहे का समृध्दी ?
दोन दिवसांच्या पलीकडं जाणार आहे का क्रयशक्ती ?
ह्या सर्वांसाठी उत्तर देणार आहे का हे शतक ?
नाही तर आकडे हलले काय
न हलले काय कुठलं शतक आलं काय
न आलं काय काही फरक पडत नाही

..ह्या हिंसेबद्दल तू काय बोलणारहेस..

ह्या दहा बाय दहाच्या शहरात
का आलास विसर्जित व्हायला?

तुझा हात तुझ्या हातात द्यायला
कोण आहे इथं ?

हा नवटाक पावशेर घाम विकून
कसं थांबवशील हे सक्तीचं कुपोषण?

हा उपरा सल रुतलेला छातीत
इथं नाहीये एखादा हलका हात

तुझे परतीचे दोर होतात तयार
तुझ्याच आतड्यांपासून

तुझी जंगलं सिव्हिलाइज्ड झाली
तिथं वाघरंही गायब झाली

हे पेटंट गाणं झालं सुरु
तुझ्या ढोलकीचं तुटलं टिपरु

तुला माळावर नाही जागा
ऑटोमॅटिक उगवल्यात बागा

तर ह्या सवसांजंला काय आहे तुझं गणित ?
काय आहे तुझं राजकारण ?

हे निर्मितीच्या वादश्या
तुझ्या निर्मितीचं गाणं गाताहेत सगळे

साउंडप्रुफ केबिनमध्ये
ह्या हिंसेबद्दल तू काय बोलणारहेस ?

..टिकाऊपणाचं बुजगावणं..

ममीकरण करुन मी टिकत नाही की
पाहत नाही आशाळभूतपणे
आंचळातील पेशींच्या आयुष्याकडे

वंशवेलींना लटकवतो पुर्नजन्माचा लोभ
उरणाऱ्या कृतीला दडपते अमरत्व
टिकाऊपणाचा सोस बिघडवतो नकाशा
जीवनासक्तीत मिळते कलासक्ती
श्रध्देला ढवळून काढते भक्ती
वेलबुट्ट्या बांधून घेतात बांधिलकी
घालून घेतला निद्रानाश खखुशीचा

ओढून कटाव,कुणाचा टिकाव
हे तृतीयरत्न,हे मोहना बटाव

सालोसाल
मेहनत चालू द्याण्यावर
यूज अँड थ्रोच्या तोंडावर
रचनात्मक कामं क्वचितच तरंगतात
पाण्यावर

# समकालीन कवितेचा महाकवी : अरुण काळे

भावापेक्षा मित्र हा जवळचा सखा असतो.

अरुणची आणि माझी भेट १९८८ च्या दरम्यान झाली तेव्हा कामगार कल्याण मंडळातर्फे कविसंमेलन होत असत.काव्य वाचनाचे मला अनेकदा पुरस्कार मिळाले असल्यामुळे कविसंमेलनाचे मला निमंत्रण असायचे.एकलहरे,नाशिक येथील विद्युत मंडळाच्या कॉलनीत कामगार कल्याण केंद्राने कविसंमेलन आयोजित केले होते.तेथे पहिल्यांदा माझी आणि अरुणची ओळख झाली होती.अरुण आणि मी सिडकोत राहात होतो.तसेच आम्ही सिडकोतील बौध्द मंडळींनी पंचशील प्रबोधन मंडळाची स्थापना केली होती.त्या मंडळात सिडको ऑफिसमधील पठारे साहेब,टेलिफोन ऑफिसमधील पगारे साहेब,एम.एस.इ.बी.मधील के के मोरे साहेब,जगताप गुरुजी,मधुकर सोनवणे,शिरसाठ सर होते.आम्ही मंडळासाठी सिडको कडून जागा घेण्याचे ठरवले तेव्हा वर्गणी गोळा करण्याच्या निमित्ताने अरुण काळे,भालेराव बाबा,दिवंगत जॉनीमामा गांगुर्डे,दिवंगत ॲड.धिवर साहेब अठांगळे बाबाची ओळख झाली आणि सिडकोकडून जागा विकत घेण्यासाठी आम्हाला सिडकोत राहणारे आमदार दिवंगत भिकचंद दोंदे साहेबांची फार मदत झाली.

पंचशिल प्रबोधन मंडळाच्या वतीने आम्ही १४ एप्रिल,०६ डिसेंबर,दादासाहेब गायकवाड जयंती,धम्मचक्र परिवर्तन दिन असे कार्यक्रम घ्यायचो.या कार्यक्रमाच्या निमित्ताने अरुण भाषण करायचा,आग्रहाखातर कविता वाचायचा.एरव्ही तो कोठेही कविता वाचत नव्हता.पहिल्याच कामगार साहित्य संमेलनात त्याच्या कवितेला दूसरे पारितोषिक मिळाले आणि अरुणचा आत्मविश्वास बळावला.चळवळीचा कार्यकर्ता असल्यामुळे साहित्यिक वाचन आणि पुस्तक संकलनाचा अरुणला चांगलाच नाद होता.म्हणून आजमितीला तो नसतांनाही त्याच्या संग्रही दिडहजार ग्रंथांचा संग्रह आहे.यावरुन समजावे की,फुले आंबेडकरी लेखक कवी हा प्रथम वाचक आणि कार्यकर्ता असतो.आणि नंतर तो कवी आणि लेखक असतो.म्हणूनच अरुणची कविता समकाळाशी भिडलेली आहे.वास्तवाची विविध रुपे दर्शवणारी आहे.कवितेच्या माध्यमातून अरुणने वाङ:मय विश्वात आपलं वेगळं अस्तित्व निर्माण केलं आहे.

सुरुवातीला अरुण आणि मी,रात्री जेवणानंतर राणेनगर बसस्टॉप ते राजीवनगर चक्कर मारायचो.तो माझ्याकडे आला की खालूनच आवाज देत असे, 'झोपला का रे'?मी त्याच्याकडे गेलो की मीही खालूनच अरुण अरुण असा आवाज देत असे.आमच्या दोघांच्या बिल्डींगमधल्या लोकांना आमचे आवाज परिचित झालेले होते.दिवसभरात कोण भेटलं,कोणाचा फोन आला,काय काय केलं,काय वाचलं काय लिहलं,ते आम्ही एकमेकांना वाचून दाखवायचो,चर्चा करायचो.

मित्र म्हणून अरुणने महाराष्ट्रभर मित्र मिळवले होते.साहित्य क्षेत्रातले सर्व थरातले त्याचे मित्र होते.त्याचे मुख्य कारण,सर्वांना भिडणारी त्याची कविता.अरुणची कविता मुंबईला एका वृत्तवाहिनीच्या कार्यक्रमात प्रसिध्द निर्माता दिग्दर्शक जब्बार पटेलांनी वाचली.विचारवंत साहित्यिक प्रा.भा.ल.भोळे यांनी युगवाणी नियतकालिकातून अरुणच्या कवितेवर भरभरुन लिहिले.तर अनेक वाङ:मयीन,सामाजिक,सांस्कृतिक संस्थांनी त्याला पुरस्काराने सम्मानित केलेले आहे.अरुण मागील २ वर्षांत कविता,पुरस्कार आणि कार्यक्रमानिमित्त सारखा फिरतच होता.महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कारा निमित्त मी आणि प्रदीप जाधव कुटूंबासह या पुरस्कार सोहळयाला हजर होतो.आम्ही सर्वांनी मुंबई दर्शन सहल केली.अरुणने आमचे सर्वांचे भरपूर फोटो काढले.मला आणि प्रदीपला सीडी मध्ये फोटो डाऊनलोड करुन दिले.अरुणने आम्हाला हा संकेत तर दिला नव्हता ना ? अरुणची मेशी (नागपूर)येथे २५ फेब्रुवारीला होणाऱ्या अक्षरमानव संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाली होती.मी,गंगाधर अहिरे,कैलास पगारे,प्रकाश होळकर,प्रदीप जाधव,मुंबईहून सतीश काळसेकर,सौमित्र,प्रतिभा टेंभे आम्ही सर्व अरुण सोबत या संमेलनास जाणार होतो.आमची २४ तारखेची रेल्वे टिकीटही बुक्ड झाली होती.आणि २० तारखेला अरुणचं निधन झालं.

खरं म्हणजे,अरुण आज आमच्यात नाही आणि इतक्या लवकर तो आम्हाला सोडून जाईल यावर माझा विश्वासच बसत नाही.

काशिनाथ वेलदोडे
( अतिथी संपादक )

..मला उरकायचीत कामं मान्सूनपूर्व..

धाडधाड कोसळत्या धबधब्यात
जगणं पिसून काढल्यावर
काळयाचं पांढरं होतांना
पॉझिटिव्हची निगेटिव्ह झाल्यावर
कोण ऐकेल ही भुरटी लुडबूड
शहाणपणाच्या चार म्हाताऱ्या गोष्टींची

इथं रोज होतोय हल्ला
वर तुमचा सबुरीचा सल्ला
ही वीर्यपात झाल्याची स्थिती
सामंजस्याची

घर जाळल्यावरपण कसं म्हणणार ?
चुकून काडी पडली आसंल ?
मुजोर गाडिने फुटपाथवर उडवल्यावर
कोण म्हणेल लागूद्या लागूद्या
काय नाही,फक्त हातच तुटला

साहेबराव
तुमची झुळूझुळू वाहणारी चळवळ
डायनिंग टेबल तळमळ
तुमच्याजवळच ठेवा

उन्हं उतरल्यावर आरामात
व्याख्यानाला जावा
मी तुमच्यातून कोसो दूर गेलेलो
माझा मोर्चा भर दुपारच्या उन्हातला
आज दुष्काळ पडलाय
उद्या पाऊसही पडेल
तुम्ही झटका तुमच्या छत्र्या
मला उरकायचीत कामं
मान्सूनपूर्व !

..अरुण काळे..

## अतिथी संपादकाचा परिचय –

**नाव** - काशिनाथ मंजुळाबाई वेलदोडे

**प्रकाशित साहित्य** - घुसमट,वात्सल्य (काव्यसंग्रह)

**संपादन** - काव्यगुंफा(मराठी कवितासंग्रह),प्राशिक(मराठी स्मरणिका),वसुंधरा(मराठी स्मरणिका),नवी सनद(त्रैमासिक)

**संयोजन** - बहुभाषिक कवीसंमेलन,फुले आंबेडकर साहित्य संमेलन,विद्यार्थी युवा साहित्य संमेलन,सम्यक प्रबोधन व्याख्यानमाला, १५ वे कामगार साहित्य संमेलन नाशिक, कला जथ्था शिबीर(भारत ज्ञान विज्ञान समुदाय समिती)

**पुरस्कार** - विश्वकर्मा राष्ट्रीय पुरस्कार(भारत सरकार),
गुणवंत कामगार कल्याण पुरस्कार(महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ),
महाकवी आचार्य अश्वघोष पुरस्कार,
शब्दगंध साहित्य पुरस्कार,
ज्ञानदीप काव्य पुरस्कार,
सदानंद पेठे स्मृती हिंदी काव्य पुरस्कार,
औदुंबर काव्यलेखन पुरस्कार,
कर्मवीर काकासाहेब काव्यलेखन पुरस्कार,
सा.प्रतिवेध काव्यलेखन पुरस्कार,
लोकहितवादी वैचारिक लेखन पुरस्कार(महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ),
साहित्यमणी(मध्य प्रदेश पुरातन इतिहास साहित्य संशोधन संस्था बालाघाट)

# अरुण काळे : संयमी योध्दा

..मल्टीलूटालुटीचा झिंग लपालपा..

बजाव नाचो
झिंग लपालपालपा,झिंग लपालपा
खुल्क है खुदाका आणि मुल्क जनताका
हुकूम कंपनीका,नाचो झिंग लपालपा
घुंब घुंब नकानका,झिंग झिंग लपालपा

श्वापदाने मारली शिकार
तोंड खुपसून दिली डकार
टूक टूक पाहणाऱ्यांनो कोल्हे लांडगे,गिधाडांनो
तुटून पडा लुटालुटा,दात विचका पुढे घुसा
हाव आहेच,ताव मारा,पोटं तुडूंब भरली आता
जाणाराची जान गेली,खेद नको खंत नको
तो नालायक गेला म्हणा,नाचा अन आनंद करा
खुल्क है खुदाका..

गवा ताकदवान होता,समूहाच्या बाहेर होता
कुत्र्यांनी कॉर्नर केला,भुंकून भुंकून भंडावला
टेकाडावर वर नेला,युक्तीने खाली पाडला
पडला अन तुटून गेला,शक्तीसह मरुन गेला
दूसरा एड्डू धावला,त्याला आधी हवेत नेला
हळूच झाडावर चढवला,तो जरा नादावला
ख्र्यॅक करताच दचकला,धापड्न आवाज आला
शिकारी वर्ग तुटून पडला,पूर्ण फडशा पाडला गेला
खुल्क है खुदाका..

जागोजाग शिकारी झाले,नवनवे हाकारे आले
त्यांनी वाटा आडवल्या,पाणवठे आडवले
दुबळ्यांची कोंडी झाली,समूह अस्ताव्यस्त झाले
म्होरके लाभार्थी झाले,स्वतःमध्ये व्यस्त झाले
त्यांचे स्विच ऑफ झाले,नॉट रिचेबल झाले
आऊट ऑफ कव्हरेज झाले,मौजूद नाही म्हणाले
त्यांचे वाढदिवस आले,शुभेच्छांचे पीक आले
चंगळचंगळचंगळचंगळचंगळ झाली
चंगळीच्या झाल्या कविता,चंगळीची झाली गाणी
खानपान सेवा आहे,ऐश करा नाचा
खुल्क है खुदाका..

..अरुण काळे..

अरुण काळे..कवितेच्या प्रवासातील एक सच्चा मित्र.कवितेवर भरभरुन प्रेम करणारा,कवितांसाठी जगणारा आणि मरणाराही.अरुण सोडून गेलाय असं वाटतच नाही.वाटतं,तो आहे अजूनही 'रॉक गार्डनात', 'सायरनच्या शहरात', 'नंतर आलेल्या लोकांत', 'ग्लोबलच्या गावकुसात' आणि कवितेसाठी जगणाऱ्या हरेक श्वासात.सतत प्रवास करणारा,मित्रांसोबत जगणारा,कवितेच्या विश्वात तडफडणारा अरुण सर्व मित्रांच्या काळजात रुतून बसलेला आहे.

१९८० पासून अस्मितादर्शच्या डॉ.आंबेडकरी विचार प्रवाहात जे अनेक नवे दमदार सृजनशील कवी आलेत.शरणकुमार लिंबाळे,ऋषिकेश कांबळे,लोकनाथ यशवंत,मनोहर जाधव,राजेंद्र सोनवणे,शशिकांत हिंगोणेकर,उषा हिंगोणेकर,सतेश्वर मोरे,भुजंग मेश्राम,महेंद्र भवरे,धर्मराज निमसरकर,प्रज्ञा पवार,प्रसनजीत ताकसांडे,दिपध्वज कोसोदे,संजीवकुमार सोनवणे,उत्तम अंभोरे,किशोर मेढे इ.त्यात अरुण काळेने स्वतःची नवीन परिमाणे निर्माण केलेली आहेत.१९९३ साली प्रकाशित रॉक गार्डन काव्यसंग्रहामुळे अरुण लक्षवेधी कवी ठरला.१९९७ ला 'सायरनचे शहर' प्रकाशित झाले आणि कवितेच्या वाटचालीत अरुणची स्वतःची वाट तयार होवू लागली.ह्या संग्रहाने तर अरुणच्या कवितेचा सायरन वाजायला सुरुवात झाली होती.हा कवितासंग्रह हिंदीतील सुप्रसिध्द दलित साहित्यिक ओमप्रकाश वाल्मिकी जे एप्रिल ०८ चंद्रपूर येथील अस्मितादर्श साहित्य संमेलनाचे अध्यक्षही होते त्यांना खुपच आवडला होता.त्यांनी वर्तमान साहित्य या हिंदीतील दर्जेदार वाङःमयीन नियतकालिकातून अरुणच्या काही कविताही अनुवादित केल्या होत्या.सायरन का शहर नावाने त्यांनी तो कवितासंग्रह हिंदीत अनुवादितही केला आहे. जाने/फेब्रु ०८ अखेर हे पुस्तक प्रकाशित व्हावे अशी अरुणची तीव्र इच्छा होती.त्यासाठी मी,अरुण जाने ०८ मध्ये पुण्यास गेलो होतो.सुविद्या प्रकाशनाचे अनंत पुराणिक ह्यांनी तात्काळ काव्यसंग्रह प्रकाशित करण्याचे मान्य केले.हे अरुणने कवीवर्य नामदेव ढसाळ ह्यांना फोनवर सांगितले.त्यावेळेस त्या दोघांचा संवाद ऐकतांना जाणवलं की अरुण ढसाळांच्या किती जवळ आहे.नामदेव ढसाळांच्या कवितेची उर्जा आम्हा सर्वांनाच मिळाली आहे,ह्या उर्जेजवळ जाण्याचे धैर्य सगळ्यांनाच मिळालेले नाही,अरुण ढसाळांच्या उर्जेजवळ आहे आणि मी अरुणच्या जवळ आहे.म्हणजे ढसाळांच्या उर्जेजवळच आहोत असे मनात वाटत राहिले.आता अरुणच्या पहिल्या स्मृतीदिनी ते पुस्तक येत आहे.

'नंतर आलेले लोक'ने तर अरुणच्या कवितेला एक नवा सर्वव्यापी उजेडच दिला.अरुणची कविता प्रकाशमयी झाली,कवितेच्या जगात तिची स्वतंत्र सिध्दता झाली.

मी शासकीय कन्या शाळा,नाशिक येथे असतांना अरुण'नंतर आलेले लोक 'ची खास प्रत माझ्यासाठी घेऊन आला होता.खुप सुखद धक्का होता तो.अतिशय सस्नेहाने हसत जेव्हा त्याने पुस्तक माझ्या हाती दिलं,मी त्याला म्हणालो होतो

अरुणची आणि माझी भेट कधी झाली ते निश्चित आठवत नाही पण त्याच्या कवितेची भेट मात्र विविध नियतकालिकातून व्हायची.त्याच्या कवितेकडे माझे लक्ष असायचे.त्याची कविता नेहमीच स्वतःच्या वैशिष्ट्यास जागायची.वेगवेगळ्या साहित्य संमेलनातून अरुण भेटायचा.बोलणे मोजकेच व्हायचे.खरी भेट राहून जायची.असे खुपदा व्हायचे.एकदा एका भेटीत तळमळीने बोलून झाल्यावर,अरुणने मला मोठ्या प्रेमाने एका हॉटेलात जेवू घातले.कवितेच्या प्रवासाबद्दल तो बोलत राहिला.खुप लिहायचे आहे,मनातले सारे बाहेर काढायचे आहे,जे जगतो आहे तेच कवितेतून सांगायचेय असे बरेच तो बोलला.आपल्या पिढीच्या कवींकडे आपल्याच प्रस्थापितांचे दुर्लक्ष होत आहे.दखल घेतली जात नाहीय,अशा प्रामाणिक भावनाही त्याने व्यक्त केल्यात.आपण समकालीन कवी/लेखकांनी एकत्र येऊन प्रकाशन संस्था सुरु करण्यासाठी एकत्र येण्याबद्दलही तो बोलला.मोतीराम कटारे,महेंद्र भवरे,काशिनाथ वेलदोडे असे सारे एकत्र मिळून प्रकाशन संस्था काढणारही होते पण ते काही कारणाने शक्य झाले नाही.पुढे अरुणशी भेटी वाढत गेल्या.प्रत्येक भेटीत अरुणच्या कवितेचे पुढील टप्पे त्याच्या कवितेतून जाणवत होते.कवितेविषयीची नितांत श्रध्दा त्याच्या मनात उगवून आलेली होती.कविता ही त्याच्या जगण्याचा आधार,लढण्याचे हत्यार होती.पण कवितेचा ढालीसारखा वापर त्याने कधीच केला नाही.कवितेपेक्षा कधी स्वतःला मोठेही मानले नाही.अरुणच्या कवितेवर प्रेम करणाऱ्यांनाही त्याने त्याच्या आयुष्यात मोठेच स्थान दिले होते.

बाबूराव बागूल यांच्या जेव्हा मी जात चोरली आणि मरण स्वस्त होत आहे ह्या कथासंग्रहांनी माझ्या मनाला कधीचाच चटका लावला होता.त्यांना भेटायची तीव्र इच्छा मी अरुणजवळ बोलून दाखवली होती आणि त्याच्यामुळेच त्या महान लेखकासोबत आयुष्यातले काही क्षण मला मिळाले,ते क्षण सोनेरी झाले.अरुणमुळेच ती भेट शक्य झाली होती.बाबूरावांच्या घरची अवस्था पाहून मन विषण्ण झाले होते.ते म्हणाले होते,'मी जर या देशापेक्षा पाश्चिमात्य देशात जन्माला आलो असतो तर माझ्या लेखणीचा खुप सन्मान झाला असता'.ते खुप हताशपणे हे बोलत होते.अरुण अस्वस्थपणे म्हणाला, 'या देशात कुठल्याही जातीत जन्म घेतला तरी कलावंताला मोठे होता येईल का'?अरुणचा हा प्रश्नही त्या रात्री सतावत राहिला.आता अरुणही नाही आणि बाबूरावही नाहीत.प्रश्न मात्र छळतोच आहे.

भूजंग मेश्राम हा अरुणच्या आयुष्यातील एक महत्वाचा सांधा होता.मे २००७ च्या नाशिक येथील कवी संमेलनात मेश्रामची खालावलेली तब्येत पाहून अरुण क्षणाक्षणाला मनातून दुभंगत होता.त्याची लहान मुलासारखी काळजी घेत होता.आम्ही हे सारे पहात होतो,अनुभवत होतो.

दुःख कितीही आले तरी ते पचवण्याची धीरगंभीर प्रवृत्ती अरुणची होती.अरुणचा मोठा भाऊ हरीष तसेच आईच्या निर्वाण प्रसंगातही अरुण खंबीर उभा होता.बुध्दाची ही स्थितप्रज्ञता अरुणला लाभलेली होती.

अरुणची आणि माझी शेवटची भेट १६ फेब्रु ०८ ला नाशिक येथील ओबीसी साहित्य संमेलनात झाली.त्याचे उबदार हस्तांदोलन अजूनही जाणवते आहे.त्याच महिन्यात २२/२३ फेब्रु ला अरुण तुमसर,भंडारा येथे राजन खानच्या मानवलोक साहित्य संमेलनात अध्यक्ष म्हणून निवड झाल्याने जाणार होता.

त्याच्या जाण्याची बातमी खरीच वाटत नव्हती,मी त्याचा मोबाईल नंबर लावला,मोबाईल वाजत होता.वाटले,अरुणच बोलेल,हां बोल रे शशी.पण तसे झाले नाही.

अरुणच्या भेटींच्या खुप आठवणी आहेत,त्या सर्व भेटीतून तो भेटत गेला,भिडत गेला.अजूनही मी नाशिकला गेलो म्हणजे सुप्रसिध्द मानवतावादी लेखक आयु बी जी वाघ तथा मुख्य कार्यकारी अधिकारी जि प नाशिक यांच्या संवादातून अरुण भेटत राहतो.त्याच्या कवितेच्या शैलींची,वैशिष्ट्यांची,सामर्थ्याची चर्चा होत राहते.काशिनाथ वेलदोडे,स्वप्ना कोल्हे,करुणासागर पगारे,अशोक पवार,राजेंद्र म्हसदे,प्रा सरोज जगताप,प्रा गंगाधर अहिरे यांच्याही संवादातनं अरुण श्वास घेतोच आहे.इथल्या विषम समाजव्यवस्थे,अर्थव्यवस्थे विरुध्द डॉ आंबेडकरी विचारांचे हत्यार हाती घेवून कवितेतून लढणारा संयमी योध्दा असलेल्या अरुणची लिहण्याची,जगण्याची लढाई एकच होती.ही लढाई छुपी नव्हती.प्रामाणिक होती.मानवी कल्याणासाठी प्रेमाचे जागतिकीकरण होऊ द्या असे म्हणणारा अरुण नंतर आलेले लोक मध्ये प्रयोजन या कवितेत शेवटी म्हणतो कुणी अक्षर सुधारण्यासाठी कविता लिहत नसतो हे प्रत्येक कवीच्या जगण्याचे त्रिकालसत्य सांगणारा अरुण नंतर पुन्हा पुन्हा कवितेतून भेटतो आहे.धीर देतोय.

शशिकांत हिंगोणेकर,जळगाव
( गट शिक्षण अधिकारी,पंचायत समिती,मुक्ताईनगर,जळगाव )
( अतिथी संपादक )

# अरुण काळे : सायरनच्या शहरातील दमदार कवी

चौकार षटकारांची आतषबाजी करीत क्रिकेट रसिकांच्या डोळ्यांचे पारणे फेडणाऱ्या आघाडिच्या फलंदाजाने अचानक निवृत्ती जाहीर करणे जसे धक्कादायक वाटते.नेमके तसेच ऐन भरात असलेला,माणसांच्या जगण्याला प्राधान्यक्रम देऊन शब्दात पकडणारा,चहाच्या टपरीवरील पोरापासून गिरणी कामगारापर्यंतच्या कष्टकरी जमातीच्या व्यथा वेदनांचे प्रतिबिंब त्यांच्याच बोलीभाषेत शब्दबध्द करणारा या शतकातील दमदार कवी आणि दिलदार माणूस या दोन्ही आघाड्यांवर स्वतंत्र मुद्रा उमटविणारा व सायरनच्या शहरातील नंतर आलेल्या लोकाआधीच रंगात आलेल्या काव्य मैफलीतून अकस्मात उठून गेलेल्या अरुण काळे यांचा मृत्यू चटका लावून जाण्यासारखाच आहे.म्हणूनच पारंपारिक आणि साचेबध्द कवितेला छेद देण्यासाठी जेव्हा काळे यांच्या कवितेची मराठी काव्यविश्वाला नितांत गरज होती,अशा एका महत्वाच्या वळणावर काळे ह्यांनी कोणाच्या ध्यानीमनी नसतांना मृत्यूला कवटाळणे अधिक क्लेषदायी वाटते.

१९७२ च्या दुष्काळाचे दाहक चटके ऐन तारुण्यात सोसलेले अरुण काळे दलित पँथरच्या उदयासोबतच उमेदीत आलेले होते.पँथरच्या विघटनाने अस्वस्थ झालेल्या या संवेदनशील कवीला अखेर कवितेनेच सावरले.नामदेव ढसाळ यांच्या गोलपीठाच्या प्रभावाने आत्मविश्वास दुणावल्याची प्रांजळ कबुली देणारा हा कवी म्हणायचा,कविता ठरवून लिहली नाही,ती लिहली गेली.तिने रक्ताच्या नात्यापेक्षा जास्त सुह्द दिलेत.तिचे ऋण फेडणे कठीण आहे.चांगली कविता नाही दिली तर हे प्रेम वाया जाईल.म्हणूनच जमिनीवर घट्ट उभे राहून आपण तिच्याशी घट्ट नातं कायम ठेवू.

बुध्द विचाराने भारलेला,विसाव्या शतकाच्या शेवटच्या पर्वात उदयाला येऊन आपलं आगळं वेगळं स्थान निर्माण करणारा हा कवी वरकरणी पाहिल्यावर अगदी रांगडा माणूस वाटायचा.रांगड्या व्यक्तिमत्वाआड एक संवेदनशील,चिंतनशील कवी नांदतो याचा प्रत्यय रसिकांना त्याच्या पहाडी आवाजातील कविता ऐकतांना यायचा.सायरनचे शहर या संग्रहाच्या माध्यमातून चर्चेत आलेला हा कवी रॉक गार्डन नंतर नावारुपास आला.आणि नंतर आलेले लोकच्या माध्यमातून तर साठोत्तरी नंतरच्या कालखंडातील दमदार व आश्वासक कवी म्हणून त्याला काव्य रसिकांनी अक्षरशः डोक्यावर घेतलं होतं.सायरनचे शहर व रॉक गार्डन पेक्षा त्यांची अधिक वाहवा नंतर आलेले लोक मुळे झाली.ऑक्टोबर ०७ मध्ये जळगावच्या जैन चॅरेटिजतर्फे बालकवी ठोंबरे पुरस्कार व २००८ मध्ये महाराष्ट्र फाउंडेशनच्या वतीने उत्कृष्ट कवी म्हणून त्यांना सन्मानित केले ते याच काव्यसंग्रहाने.नंतर आलेले लोक मध्ये स्वतःशीच संवाद साधतांना त्याने त्याची भूमिका,बांधिलकी व स्वीकार नकाराचं नितळ तत्वज्ञान स्पष्ट केले आहे.

आपण लावतो दुःखाची गोठ
अनुल्लेखाची बटनं ऑन होतात
आपण नसतो प्रस्थापित कवी
राजहट्ट वा बालहट्टवाले
आपण लावतो वंचिततेच्या मारावर
बांधिलकीचे मलम
अनित्यावर नित्य निष्ठा ठेवून
आपण चालवावं आपलं डोकं
नरकाच्या भीतीपोटी
कवितेवर अविश्वास दाखवू नये
स्वर्गाच्या क्षेत्रफळाशी
देणं घेणं ठेवू नये

अशी ही विचाराकडे नेणारी भावनेची कविता,नवीन दृष्टी देणारी,माणसांच्या ह्दयात कोमल भाव जागवणारी,दलितांच्या अगतिकीकरणाची ग्लोबल आणि नोबल तसेच अन्याय,अत्याचार व शोषणाविरुध्दची कविता लाखमोलाची वाटते.

नवा शब्द,नवा आशय,नवी दृष्टी देणारा हा कवी मानवतावादाचा खंदा पुरस्कर्ता होता म्हणूनच एका कार्यकर्त्या कवीची,लोकांत मिसळणाऱ्या दर्दी माणसाच्या कवितेचे मोल अधिक आहे.एक दमदार कवी म्हणून अरुण काळे जेवढे परिचित होते तेवढेच दिलदार माणूस म्हणूनही त्यांच्या समकालीन कवींमध्ये सुपरिचित होते.म्हणूनच यापुढे जेव्हा जेव्हा कवितेच्या मैफली रंगतील,संमेलनाचे उरुस साजरे होतील पण त्या मैफलीत त्या गर्दीत अरुण काळे नावाच्या कवीची अनुपस्थिती निश्चितच जाणवत राहील.आकाश आपलं म्हणणं भ्रमच,गोष्ट मातीचीच खरी आहे रे दोस्ता असे म्हणणाऱ्या या कवीने भरलेल्या मैफलीतून वाट वाकडी केल्याने आता असेच म्हणावे लागेल.

आकाश आपलं म्हणण्याचा
भ्रम दूर करुन
तू आकाशाचाच झालास
कितीही नाकारलं मनानं
पण गोष्ट तुझ्या नसण्याचीच
खरी आहे रे दोस्ता

संजय वाघ,नाशिक
(वरिष्ठ उपसंपादक - लोकमत,नाशिक)
( अतिथी संपादक )

..लर्निंग लायसनवाली फुलपाखरं..

विद्वान खातात पुस्तकांची पानं
तुम्ही खाल्ली तुती टनावारी
रेशमावर सोडलं पाणी तर
वाढले बीजांड कोष

लर्निंग लायसनवाल्या पोरांसारखे
उडू लागले इकडून तिकडे हेल्मेट काढून
आदळू लागले फुलाफुलांवर
पगाराचा गुटखा सेवन,कमी जेवण
पानाचीही लागली चट

दंगलीतल्या गोळ्यांसारखी भर दुपारी
झाली गारपीट सुरु
तुम्ही तुमची फुलं आणि अनेक इच्छांचा चिखल
उद्वेलीत झाले आशावान
तर लोक म्हणाले
कुठल्या शब्दरत्नाकरात याचा अर्थ शोधायचा ?

..अरुण काळे..

..प्रयोजन..

ही गुलामांची रोपं कोण करतंय विकसित ?
कोण करतंय वाहतूक ग्रंथांमधून कधीची ?
बजेटमधून रस्त्यात अर्थ नसलेल्या वस्त्यांत ?

हे दुःखी लोक अन ह्या जाहिराती
हे चौकाचौकातले मड आयलंडस
हे एक्स्चेंज मेळावे अन ढुंगण घोळावे

ही तृष्णा,हा सिकंदर,हा हिटलर,हा बुध्द
तृष्णा नाहीशी झाली तर काय होतं
सोन्याचा आणि पाण्याचा भाव डाऊन होतो ?

काय असतं आयुष्य ?
एक पंचांग,एक कॅलेंडर,एक तारीख
मग मत्यू काय एक्झिटचं गेट असतं कोलॅप्सिबल

अन सुरक्षितता
सुका काथ,सातारी हरी पत्ती
वर बंदुकीची एक गोळी
काय असतं अंतिम..

विचार,तत्व की कपडेलत्ते
संध्याकाळ झाली की
आपले हात आपल्या बटनांकडे जातातच !

कणी अक्षर सुधारण्यासाठी
कविता लिहीत नसतो

..अरुण काळे..

मराठी भाषेसाठी नोबेल मिळवण्याचे स्वप्न पाहणाऱ्या व त्यासाठी झटणाऱ्या तसेच मराठी कवितेला प्रचंड उंचीवर नेण्याचा ध्यास ठेवणाऱ्या आणि जगभरातील मराठी माणूस शब्दांच्या माध्यमाने जोडू पहाणाऱ्या नेटाक्षरीने सुप्रसिध्द कवी अरुण काळे ह्यांच्या प्रथम पुण्यतिथीनिमित्त त्यांना आदरांजली म्हणून हा विशेषांक काढला,ह्याचे मला अतिशय कौतुक वाटले.त्याबद्दल संपादक मंडळाचे हार्दिक अभिनंदन.

इथून पुढेही मराठी साहित्य विश्वात मोलाची कामगिरी बजावणाऱ्या हरेक कवीची,लेखकाची नेटाक्षरी अंकांमध्ये दखल घेतली जाईल ही आशा.

प्रा.एम.एल.नकोशे,नाशिक
(सहसंपादक : करुणापर्व त्रैमासिक द्वारा प्रज्ञा प्रबोधिनी,नाशिक )
( अतिथी संपादक )

## संपादकीय

हा अंक बनवत असतांना अरुण काळे सरांशी संबंधित अनेकांना भेटण्याचा योग आला.प्रत्येक जण काळे सरांच्या जादूई व्यक्तिमत्वाने,रोख ठोक शैलीतल्या कवितेने भारलेला.

जाणवत गेलं,की ह्या शब्दांच्या जादूगाराने कित्येकांच्या मनात त्यांना अपेक्षित अशा इच्छांचे,स्वप्नांचे रोपटे रुजवलेले आढळेल.

अरुण काळे सरांशी माझी पहिली आणि अखेरची भेट जानेवारी ०८ मध्ये प्रज्ञा प्रबोधिनीच्या एका काव्य शिबीरात झाली.कार्यक्रम रंगात आलेला असतांना अचानक लाईट गेले,माईक बंद झाला.जेव्हा उपस्थितांनी पुन्हा मला कविता वाचायला आग्रह केला तेव्हा स्वतः काळे सरांनी माझी कविता त्यांच्या दमदार आवाजात वाचली,तिचे रसग्रहण केले.कौतुक केले.

त्यांची स्वाक्षरी घेतांना जेव्हा मी त्यांना माझ्या कवितांच्या ब्लॉगविषयी सांगत होते तेव्हा ते उत्साहाने म्हटले की,मलाही माझ्या काही कविता इंटरनेटवर प्रकाशित करायच्या आहेत,माझी वेबसाईट बनवायची आहे.तेव्हा त्यांना तात्काळ त्याविषयीची मदत देण्याचे मी मान्य केले.आणि अगदी १ महिन्यानेच वर्तमानपत्रात त्यांच्यां निधनाची बातमी वाचून तर मला धक्काच बसला होता.मन सुन्न होउन गेलं होतं.

जणू काही त्यांनी त्यांचं एक स्वप्नच माझ्याजवळ बोलून दाखवलं होतं.ते स्वप्न पूर्ण करण्याच्या दिशेच्या प्रयत्नात हा विशेषांक पहिलं पाऊल.

स्वप्ना कोल्हे,नाशिक
( संपादक )



हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com